प्रति,

पोलीस आयुक्त,

बृहन्मुंबई.

क्रमांक : आरएसए ०६९६/७०३/सीआर-१४०/पोल-७, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.

दिनांक : २३ डिसेंबर, १९९९.

विषय :- ओल्ड भायखळा क्लब बिल्डींग, बेलासिस रोड, मुंबई-८ या इमारतीतील बृहन्मुंबई पोलीस दलाच्या ताब्यात असलेल्या सदनिका क्र. १८ व १९ भाडे तत्वातून मुक्त करण्याबाबत.

संदर्भ :- आपल्या कार्यालयाचे अ.शा.पत्र क्रमांक१८/कक्ष-८(२)/१९९९, इमारती शाखा, दिनांक १२ फेब्रुवारी, १९९९.

पोलीस विभागाच्या ताब्यात असलेल्या सदनिका भाडेतत्वातून मुक्त करताना व त्या बदल्यात पर्यायी जागा अन्य ठिकाणी घेताना त्यात एकसूत्रता आणण्यासाठी शासनाने खालीलप्रमाणे सुधारित धोरण निश्चित केलेले आहे :-

(१) बृहन्मुंबईतील पोलीस निवासस्थानांची टंचाई लक्षात घेता, सर्वसाधारणपणे पोलीस विभागाकडे असलेल्या सदनिका भाडेतत्वातून मुक्त करु नयेत.

(२) तथापि, ज्या ठिकाणी जुन्या व जीर्ण इमारतीत बृहन्मुंबई महानगरपालिकेने नोटीस दिली असेल व सदर इमारत राहण्यास धोकादायक असेल, अशा परिस्थितीत घरमालकाने सदर इमारतीची दुरुस्ती किंवा पुनर्बांधणीसाठी सदनिका भाडेतत्वातून मुक्त करण्याकरिता मागणी केल्यास अशा प्रस्तावांचा खालील अटींच्या अधीन राहून विचार करण्यात यावा.

(अ) जर त्याच ठिकाणी घरमालक नवीन इमारत बांधणार असल्यास पोलीस विभागाकडे सध्या असलेल्या क्षेत्रफळाएवढी जागा पोलीस विभागास उपलब्ध करुन घ्यावी.

(ब) जर घरमालकाने मुंबई ऐवजी पर्यायी जागा उपनगरात देऊ केली तर पोलीस विभागाकडे सध्या असलेल्या क्षेत्रफळाच्या दुप्पट जागा घेण्यात यावी.

(३) घरमालकाने उपनगरात देऊ केलेली जागा पोलीस विभागास योग्य असली पाहिजे.

(४) रेंट ॲक्टमधील तरतुदी विचारात घेता, घरमालकाने देऊ केलेली पर्यायी जागा भाडेतत्वावर घेणे अपरिहार्य असल्याने जागेचे भाडे जुन्या भाड्याइतकेच राहील.

तसचे पर्यायी जागा ताब्यात मिळाल्यानंतर आणि पर्यायी जागा/ बांधकामात कोणतीही कायदेशीर त्रुटी नाही, याची खात्री झाल्यानंतरच जुन्या जागेचा ताबा द्यावा.

२. शासनाचे वरील धोरण विचारात घेता, प्रस्तुत प्रकरणी जागामालक ओल्ड भायखळा क्लब बिल्डिंग, बेलासिस रोड, मुंबई-८ या इमारतीतील प्रत्येकी ५६२ चौ.फूट क्षेत्रफळाच्या सदनिका पोलीस विभागास देण्यास तयार असल्यास, त्यासंदर्भातील आपल्या कार्यालयाचा अहवाल कृपया अभिप्रायांसह शासनास सादर करावा.

३. तसेच या पुढे पोलीस विभागाच्या ताब्यातील सदनिका भाडे तत्वातून मुक्त करण्याबाबतचे प्रस्ताव शासनास सादर करताना ते शासनाचे निश्चित केलेल्या सुधारित धोरणानुसार तपासून सादर करावेत.

सही/-

( रा.बा.घाडगे )

कक्ष अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन.